धरमतर खाडीतील मच्छिमारांच्या समस्या तसेच सागरी किनारपट्टीवरील प्रदुषणामुळे मत्स्योत्पादनावर होणारा परिणाम यांचा अभ्यास करण्यासाठी समिती गठित करण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन
## कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग
## शासन निर्णय क्रमांकः मत्स्यवि-१११३/प्र.क्र. ३०७/पदुम-१४
## मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
## दिनांक : २७ डिसेंबर, २०१८

**वाचा :**

१) शासन निर्णय क्रमांकः मत्स्यवि-१११३/प्र.क्र. ३०७/पदुम-१४, दि. ०९.०७.२०१४

२) शासन निर्णय क्रमांकः मत्स्यवि-१११३/प्र.क्र. ३०७/पदुम-१४, दि. २४.०२.२०१६

**प्रस्तावना :**

राज्यातील सागरी किनारी क्षेत्रातील मुंबई, मुंबई उपनगर, ठाणे, रायगड, रत्नागिरी व सिंधुदुर्ग या जिल्ह्यातील किनारपट्टीवरील प्रदुषणामुळे मत्स्योत्पादनावर होणाऱ्या परिणामांचा अभ्यास करण्यासाठी वाचा १ येथील दि. ०९.०७.२०१३ रोजीच्या शासन निर्णयान्वये समिती स्थापन करण्यात आली होती.

तद्नंतर धरमतर खाडीत सोडण्यात येणाऱ्या रसायने मिश्रीत पाण्यामुळे पर्यावरणाचा होणारा असमतोल, त्यामुळे प्रदुषण होऊन तेथील पारंपारिक मच्छिमारांच्या मत्स्योत्पादनावर होणारा परिणाम तसेच रायगड जिल्ह्यातील पेण तहसिलमध्ये डोलवी येथे धरमतर खाडीला लागून असलेल्या निप्पॉन डेन्नो इस्पात कंपनी आणि अलिबाग तहसिलमध्ये शहाबाज येथे असलेली पी. एन. पी. कंपनी सुरु झाल्यापासून ते आजपर्यंतचे मत्स्यव्यवसायाचे सामाजिक व आर्थिक सर्वेक्षण व या परिसरातील बाधित मच्छिमारांच्या संख्येमध्ये, कृती समितीने दिलेल्या आकडेवारीनुसार होणारी वाढ तसेच राज्याच्या सागरी क्षेत्रातील मुंबई, मुंबई उपनगर, ठाणे, पालघर, रायगड, रत्नागिरी व सिंधुदुर्ग या जिल्ह्यातील किनारपट्टीवरील प्रदुषणामुळे मत्स्योत्पादनावर होणाऱ्या परिणामांचा अभ्यास करण्यासाठी उपरोक्त वाचा-२ येथील शासन निर्णयान्वये समिती गठित करण्यास शासनाने मान्यता दिलेली होती. आता धरमतर खाडीत सोडण्यात येणाऱ्या रसायने मिश्रीत पाण्यामुळे मत्स्योत्पादनावर होणाऱ्या परिणामांचा अभ्यास करण्यासाठी पुन:श्च समिती स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने शासनाने खालील नमूद सदस्यांची समिती स्थापन करण्याचा निर्णय घेतलेला आहे.

## शासन निर्णय :

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे पदनाम व विभाग | पद |
|---|---|---|
| १ | डॉ. विवेक वर्तक, सहाय्यक संशोधन अधिकारी (मत्स्य), काढणी पश्चात व्यवस्थापन पदव्युत्तर संस्था (डॉ. बाळासाहेब कोकण कृषि विद्यापीठ) रोहा, ता. रोहा, जि. रायगड. | अध्यक्ष |
| २ | मा. श्री प्रशांत ठाकूर, वि.स.स. (पनवेल) | सदस्य |
| ३ | अध्यक्षांनी नियुक्त केलेला, संबंधित विषयावरील एक तज्ञ शास्त्रज्ञ | सदस्य |
| ४ | श्री. सुरेंद्रनाथ यशवंत माने, माजी आमदार, मु.पो. जाकी मिऱ्या, जि. रत्नागिरी | सदस्य |
| ५ | संबंधित जिल्हाधिकारी यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| ६ | प्रादेशिक उपायुक्त, मत्स्यव्यवसाय, कोकण विभाग, मुंबई | सदस्य |
| ७ | महाराष्ट्र पशु व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, नागपूर निर्देशित एक प्रतिनिधी | सदस्य |
| ८ | धरमतर खाडी प्रकल्प बाधित पेण अलिबाग संघर्ष समितीचा प्रतिनिधी | सदस्य |
| ९ | संबंधित सहायक आयुक्त, मत्स्य व्यवसाय (सागरी) | सदस्य सचिव |

**सदरहू समितीची कार्यकक्षा पुढील प्रमाणे राहील.**

१) धरमतर खाडीमध्ये २ कंपन्यांची जेट्टी झाल्यामुळे मच्छिमारांच्या उदनिर्वाहाचे साधन संपले आहे काय, याचा अभ्यास करणे.

२) धरमतर खाडीतील जल वाहतुकीमुळे खाडीतील मत्स्यव्यवसायावर परिणाम झाला आहे काय, हे तपासणे व त्याची व्याप्ती निश्चित करणे.

३) बाधीत मच्छिमार कुटुंबाची संख्या व झालेले नुकसान

४) धरमतर खाडीमध्ये तसेच राज्याच्या सागरी किनाऱ्यावर, इतर खाडयांमध्ये व समुद्रामध्ये सोडण्यात येणाऱ्या सांडपाण्यामुळे मत्स्यव्यवसायावर होणारा परिणाम तपासणे व त्याची व्याप्ती निश्चित करणे.

५) धरमतर खाडीमधील जल वाहतुकीमुळे व खाडीमध्ये सोडण्यात येणाऱ्या औद्योगिक सांडपाण्यामुळे खाडीतील मत्स्यव्यवसायावर परिणाम होत असल्यास त्याबाबत कायमस्वरुपी उपाययोजना सुचविणे.

६) प्रदुषणामुळे बाधीत झालेल्या माशांच्या प्रजाती व त्यांचे संवर्धन यासाठी करावयाची उपाययोजना.

सदरहू समिती तिच्या कार्यकक्षेतील बाबी अभ्यासण्यासाठी संबंधित जिल्ह्यास भेट देईल, त्यावेळी त्या-त्या जिल्हयातील सहाय्यक आयुक्त, मत्स्यव्यवसाय यांनी उपस्थित राहून समितीला आवश्यक ते सहकार्य संस्थांच्या प्रतिनिधींना उपस्थित राहणेबाबत सूचना देण्यात याव्यात.

सदरहू समितीचा कार्यकाल सहा महिने इतका राहील. समितीने विषय क्र.१,२,३ संबंधी अहवाल दिनांक ३१.३.२०१९ पर्यंत व ४,५ व ६ चा अहवाल दिनांक ३०.६.२०१९ पर्यंत सादर करणे आवश्यक राहिल.

उपरोक्त कालावधीत समितीस आवश्यक ती कार्यालयीन साधन सामुग्री, आयुक्त, मत्स्यव्यवसाय, यांनी उपलब्ध करुन द्यावी. समितीचे कामकाजाकरिता विशेष करुन पर्यावरण विषयी अभ्यासाकरिता नाविन्यपूर्ण योजनेअंतर्गत जिल्हा वार्षिक योजनेतून निधी प्राप्त करुन घ्यावा.

समितीवरील अशासकीय सदस्यांचे मानधन, दैनिक भत्ता, प्रवास भत्ता,इ. बाबी नियमानुसार देय असतील त्याप्रमाणे अदा करण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८१२२८१११७२७९६०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anoop Kumar

Digitally signed by Anoop Kumar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=257f78acf3ca20d9e91d7a73a76aa0240463e4aafdd4d13de68918dc20bad8e6, serialNumber=1c2ee608849bdb812849b6c8878f95607059b530ff717c8e39c09d06b394e02b, cn=Anoop Kumar
Date: 2018.12.28 11:26:24 +05'30'

**(अनूप कुमार)**
**प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा. मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव (सर्व)
४. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य
५. प्रधान सचिव (पदुम), मंत्रालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६. आयुक्त मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७. विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण.
८. जिल्हाधिकारी, रायगड
९. सह आयुक्त (सागरी), मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१०. प्रादेशिक उपायुक्त, मत्स्यव्यवसाय, मुंबई विभाग, मुंबई.
११. सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय, रायगड.
१२. महालेखापाल (लेखापरीक्षक/लेखा अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर
१३. निवडनस्ती.